कोकण विभागातील अपर आयुक्त,कोकण विभाग व उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग यांना त्यांच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः वाहन-२०२२/प्र.क्र.७६/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

**संदर्भ:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. जेपीएस-२०१४/प्र.क्र.११/ई-८, दि.०२/१२/२०१७.
२) वित्त विभाग,शासन निर्णय, क्र.वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८/०७/२०२०.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८, दि.२७/०६/२०२२.
४) विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण यांचे पत्र क्रमांक साशा/कार्या-७/रकाप/नवीन वाहन/२०२१-२२, दि.२१/०१/२०२२.

**प्रस्तावना:-**

कोकण महसूल विभागातील लेखाशिर्ष “२०५३- जिल्हा प्रशासन” या खाली वेतन आहरित करणाऱ्या ९७ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.०२/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. विभागीय आयुक्त कोकण यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.०३ अन्वये कोकण विभागातील अपर आयुक्त व उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग यांना त्यांच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

कोकण महसूल विभागातील या शासन निर्णयासोबतच्या **सहपत्र -अ.** मध्ये नमूद केलेल्या अपर आयुक्त, कोकण विभाग व उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग या ०२ क्षेत्रिय अधिकाऱ्यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या प्रत्येकी रुपये ८.०० लक्ष याप्रमाणे एकूण रुपये १६.०० लक्ष (अक्षरी रुपये सोळा लक्ष फक्त) इतक्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे -

१. **निधी उपलब्धतेनुसार** शासन निर्णय, वित्त विभाग क्र.-वाहन-२०१७/ प्र.क्र.४१/१७/ विनियम, दिनांक २८/०७/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीच्या अनुषंगाने अपर आयुक्त, कोकण विभाग व उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग यांना रुपये ८.०० लाखाच्या कमाल मर्यादेत (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्परारी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावी.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४,दि.०१/१२/२०१६ व क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.
३. शासकीय वाहन क्रमांक MH४३-G-३४९ व MH४३-G-३४८ या निर्लेखित वाहनाच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयासोबतच्या सहपत्रातील अ.क्र. १ ते २ साठी येणारा खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र. सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन (००) १०१,आयुक्त (०१)(०१) आयुक्त कोकण (अनिवार्य)(२०५३ ०३८७) १३ - कार्यालयीन खर्च ” व “मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन (००) ०९३, जिल्हा आस्थापना (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त, कोकण (२०५३ ००२८)१३ - कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८१/२०२३/व्यय-९, दि.३०/०५/२०२३ व अनौपचारीक संदर्भ क्र.२२९/२०२३/विनियम,दि.२७/०६/२०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२४१२१३२४७५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by DR.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=DR.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.07.24 13:23:33 +05'30'

**( डॉ. श्वेता सावदेकर )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

विभागीय आयुक्त,कोकण विभाग कोकण.
अपर आयुक्त कोकण विभाग, कोकण.
उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग,कोकण
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी,बांद्रा,मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती,( कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

( शासन निर्णय, क्रमांकः वाहन-२०२२/प्र.क्र.७६/ई-८) सोबतचे सहपत्र

**सहपत्र 'अ'**

कोकण महसूल क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांच्या वापरातील निर्लेखित वाहनांचे विवरणपत्र

| अ.क्र. | विभाग/जिल्हा | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्याचे पदनाम | निर्लेखित वाहनाचा क्रमांक | वाहनाचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | कोकण विभाग | अपर आयुक्त, कोकण विभाग | MH४३-G-३४९ | टाटा इंडिगो |
| २ | | उप आयुक्त (सा.प्र.) कोकण विभाग | MH४३-G-३४८ | टाटा मांझा |